**महाराष्ट्र शासन**

क्रमांकः- एनजीसी २००९/ (१५२ /०९)/ मशि-४
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांकः- १ सप्टेंबर,२००९.

प्रति,
कुलसचिव,
सर्व अकृषी विद्यापीठे

**विषय : शेक्षणिक वर्ष २००९-१०**
**कायम विना अनुदान तत्वावर नवीन महाविद्यालयांना**
**मान्यता मिळण्याची प्रक्रीया समाप्त झाल्याबाबत..**

**महोदय,**

शेक्षणिक वर्ष २००९-१० करिता नवीन कला, वाणिज्य, विज्ञान, व्यावसायीक व विधी महाविद्यालये सुरु करण्यास परवानगी मिळण्याबाबतचे जे प्रस्ताव आपल्या विद्यापीठामार्फत शासनास प्राप्त झाले होते. त्या प्रस्तावांची छाननी, शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक एनजीसी २००९/(३३/०९) / मशि-३, दिनांक १८ फेब्रुवारी, २००९ अन्वये गठित करण्यात आलेल्या कार्यबल गटा कडून (टास्क फोर्स) करण्यात आली. कार्यबल गटाचा (टास्क फोर्स) अहवाल तसेच महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मधील कलम ८२(५) अन्वये प्राप्त अधिकारानुसार, सन २००९-१० या शैक्षणिक वर्षात कला, वाणिज्य, विज्ञान, व्यावसायिक व विधी अभ्यासक्रमाच्या नवीन महाविद्यालयांना परवानगी देण्याचा निर्णय शासन स्तरावरुन घेण्यात आला आहे.

२. याबाबतचे सर्व आदेश विद्यापीठाकडे पाठविण्यात आले आहेत तसेच शासनाच्या संकेत स्थळावरही हे आदेश उपलब्ध करण्यात आले आहेत.

३. उर्वरित सर्व संस्थांचे प्रस्ताव शासन स्तरावर नाकारण्यात आलेले आहेत, असे समजण्यात यावे. आपणांस विनंती आहे की, ज्या संस्थांचे नवीन महाविद्यालय / विद्याशाखा / व्यावसायिक व विधी अभ्यासक्रमाबाबतचे प्रस्ताव अमान्य करण्यात आले आहेत, अशा सर्व संस्था/महाविद्यालयांना परिच्छेद क्र. १ मध्ये नमूद केल्याप्रमाणे प्रस्ताव अमान्य केल्याचे तात्काळ कळवावे व तसे शासनास अवगत करावे. परवानगी नाकारलेल्या संस्थांना त्यांचे अर्ज शुल्क त्या त्या विद्यापीठाच्या व्यवस्थापन मंडळाच्या निर्णयानुसार प्रक्रीया शुल्क कापून परत करण्यात यावे.

४. हा निर्णय संबंधित संस्थांना न चुकता व कटाक्षाने कळविण्यात यावा. सदर निर्णय न कळविल्यास व यासंदर्भात संस्था न्यायालयात गेल्यास त्याची सर्व जबाबदारी संबंधित विद्यापीठाची राहील.

हे आदेश, राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २००९०९०८१२२८३१००१आहे.

(वि.गो. चांदेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना कळविण्यात येते की, ज्या संस्थांचे प्रस्ताव अमान्य करण्यात आले आहेत, अशा संस्थांना शासनाचा निर्णय कळविण्यात आला आहे किंवा कसे याची खातरजमा करून आपल्या स्तरावरूनही कळविण्यात यावा.
२) सर्व विभागीय सह संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य.
३) **निवड नस्ती - मशि-४**